आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या वर्षात शबरी आदिवासी विकास महामंडळास वित्तीय सहाय्य या योजनेसाठी निधी वितरण.
(लेखाशीर्ष २४२५ १३५९)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.०२/ कार्यासन-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीखः २८ मार्च , २०२४.

**वाचा**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२३ /प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि. ८.१२.२०२३, दि. ५.२.२०२४ व दि. ४.३.२०२४
२) शासन निर्णय आ.वि.वि.क्र. आविवि २०२३/प्र.क्र.१३८/का.-३, दि . १४.३.२०२४
३) नस्ती क्र. आ.वि.वि. २०२३/प्र.क्र.१३८/का.३.

**प्रस्तावना –**

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांचे मार्फत अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांकरीता स्वयंरोजगाराकरीता कर्ज योजना राबविण्यास तसेच अनूसुचित जमातीच्या गटांकरीता अर्थसहाय्य देण्याच्या योजना राबविण्यास संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या अनुषंगाने आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टि-५ मधील (०१(१०) शबरी आदिवासी विकास महामंडळास वित्तीय सहाय्य २४२५ १३५९, ३३-अर्थसहाय्य खाली सन २०२३-२४ मध्ये सुधारित अंदाजात मंजूर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २४२५ - सहकार या मुख्य लेखाशीर्षाखाली शबरी आदिवासी विकास महामंडळास वित्तीय सहाय्य या योजनेकरीता वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या १०० टक्के सुधारित अंदाजाच्या मर्यादेत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

( रु. लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२३-२४ मधील मंजूर सुधारीत अंदाज | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| शबरी आदिवासी विकास महामंडळास वित्तीय सहाय्य | २४२५ १३५९ | ३३- अर्थसहाय्य | ३५००.०० | ३५००.०० (१००टक्के) |

२. वरील प्रमाणे एकूण रु. ३५००.०० लाख (अक्षरी रुपये पस्तीस कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर वितरीत निधीचा विनियोग संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या तरतूदीनुसार करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

६. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४१/२४७,दिनांक २२.३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२११०२६१३४२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.28 12:30:22 +05'30'

( राजेंद्र दे.भवारी )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. कार्यासन क्र. ३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
८. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग